**माहिती व जनसंपर्क महासंचालनालयासाठी माहिती तंत्रज्ञान विषयक सल्ला घेण्यासाठी M/s Ernst & Young LLP या सल्लागार संस्थेची ११ महिन्याकरिता निवड करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. समिती २०२४/प्र.क्र. ८४/मावज-१.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १० जुलै २०२४

**वाचा:-**

१. शासन निर्णय क्र. समिती २०२४/प्र.क्र. ८४ /मावज-१. दि.२४.०५.२०२४
२. माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, क्रमांक:- जीएडी-आयटी ०८०/४/२०१४-ओ-माहिती तंत्रज्ञान संचालनालय-डीआयटी (एमएच) दि.०५ ऑक्टोंबर २०२३
३. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे दि.१०.०६.२०२४ चे इतिवृत्त
४. संचालक (माहिती व प्रशासन यांचे क्रमांक मावज/मा.तंत्र/सल्लागार संस्था/२०२४/२२/दि.०१.०७.२०२४ चे पत्र

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागांतर्गत माहिती व जनसंपर्क संचालनालयासाठी ई-प्रशासन प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी प्रधान सचिव (मावज) यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee) संदर्भाधीन दि.२४.०५.२०२४ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आली आहे. सदर समितीच्या निर्णयाच्या अनुषंगाने संचालक, माहिती व प्रशासन यांनी संचालनालयाशी संबंधित विविध निविदा प्रक्रिया, माहिती तंत्रज्ञानविषयक तांत्रिक बाबींसंदर्भात मार्गदर्शन देणे, त्यासंबंधी कार्यवाही करणे, तसेच ई-प्रशासन प्रकल्प राबविणे या कामाकरिता महासंचालनालयास सल्ला देण्यासाठी M/s Ernst & Young LLP या सल्लागार संस्थेची ११ महिन्यांच्या कालावधीसाठी निवड करण्यास प्रशासकीय/वित्तीय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन दि. ०१.०७.२०२४ च्या पत्रान्वये सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने प्रशासकीय/ वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक, माहिती व प्रशासन यांनी M/s Ernst & Young LLP या सल्लागार संस्थेची संचालनालयाशी संबंधित विविध निविदा प्रक्रिया, माहिती तंत्रज्ञानविषयक तांत्रिक बाबींसंदर्भात मार्गदर्शन देणे, त्यासंबंधी कार्यवाही करणे, तसेच ई-प्रशासन प्रकल्प राबविणे या कामाकरिता सल्ला देण्यासाठी ११ महिन्याकरिता निवड करण्यास व या सेवेकरीता संबंधित संस्थेस द्यावयाच्या रु.२,६३,४९,४००/-( **रुपये दोन कोटी त्रेसष्ट लाख एकोणपन्नास हजार चारशे फक्त)** इतक्या खर्चाच्या प्रस्तावास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त संदर्भ क्र.२ येथील माहिती व तंत्रज्ञान उपविभागाच्या दिनांक ५.१०.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या दरनिश्चितीनुसार ११ महिन्यांकरिता सदरची सेवा घेण्यात यावी. संदर्भाधीन दि.०१.०७.२०२४ च्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या प्रस्तावानुसार दरांचा तपशील खालीलप्रमाणे राहील :-

| Category | Person | Years of Experience | Per Month per Person | Rate in INR - Per Month per Person (Excluding Taxes |
|---|---|---|---|---|
| Associate Consultant | 2 | > २ Years to to <= ५ Years | २,८५,००० X २ | रु.५,७०,०००/- |
| Consultant | 2 | >५ Years to < = ९ Years | ३,४५,००० X २ | रु.६,९०,०००/- |
| Senior Consultant | 2 | > ९ Years to < = = १३ Years | ३,८५,००० X २ | रु.७,७०,०००/- |
| | | | मासिक एकूण | रु.२०,३०,०००/- |
| | | | ११ महिन्यांकरीता खर्च<br>GST | रु.२,२३,३०,०००/-<br>रु.४०,१९,४००/- |
| **(अक्षरी एकूण रुपये दोन कोटी त्रेसष्ट लक्ष एकोणपन्नास हजार चारशे फक्त)** | | | | **रु.२,६३,४९,४००/-** |

३. संबंधित सल्लागार संस्थेमार्फत करण्यात येणाऱ्या कामकाजाचा आढावा दर ३ महिन्यांनी महासंचालनालयाच्या स्तरावर घेण्यात यावा.

४. या सर्व प्रक्रियेवर संचालक, माहिती व प्रशासन यांनी देखरेख व नियंत्रण ठेवावे.

५. सदर शासन निर्णय,वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ च्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, मधील भाग पहिला, उप-विभाग तीनच्या अनुक्रमांक चार, परिच्छेद क्रमांक २७(२) नुसार प्रशासनिक विभागाला दिलेल्या अधिकारानुसार त्यातील अटींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७१०१५२३५८३४०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

YUVRAJ MANOHAR SOREGAONKAR

Digitally signed by YUVRAJ MANOHAR SOREGAONKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=f7ccdb18d954bb814d3cc3c92ab0c128e19f5f95c724abaf0a38fa1a74dec734, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A45294B68B97E03C570AFA8F17C64F6DFE2A4A241DD2AFF2322FEEC22B389F5, cn=YUVRAJ MANOHAR SOREGAONKAR
Date: 2024.07.10 15:34:58 +05'30'

**( युवराज सोरेगांवकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
प्रधान सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (नियोजन विभाग) नियोजन विभाग,मंत्रालय मुंबई.
प्रधान सचिव (माहिती व जनसंपर्क), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई.
महासंचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई.
संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई.
संचालक (माहिती) (प्रशासन) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय मंत्रालय,मुंबई.
संचालक (माहिती) (मावज) विभागीय माहिती कार्यालय-नागपूर
संचालक (माहिती) (मावज) विभागीय माहिती कार्यालय-छत्रपती संभाजीनगर

राज्य सूचना अधिकारी, राज्य सूचना विज्ञान केंद्र, पुणे.
महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता) / लेखा परीक्षा, महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल २ (लेखा व अनुज्ञेयता) / लेखा परीक्षा, महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
निवडनस्ती.(मावज-१)